राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-८/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा -

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३(अ), दि.०४.०८.२०१७.
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र. वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/पोल-३, दि.०४.०९.२०१७.
४) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई व मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि. यांच्यात दि.११.११.२०१९ रोजी झालेला करार.
६) गृह विभाग, शासन निर्णय क्र. वितंप्र-३६२०/प्र.क्र.२१/पोल-३, दि.०५.०३.२०२०, दि.२८.०८.२०२० व दि.१८.१२.२०२०.
७) गृह विभाग, शासन निर्णय क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-४/पोल-३, दि.२३.०६.२०२१
८) गृह विभाग, शासन निर्णय क्र. वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-३/पोल-३, दि.०५.१०.२०२१
९) गृह विभाग, शासन निर्णय क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-४/पोल-३, दि.२४.११.२०२१
१०) गृह विभाग, शासन निर्णय क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-८/पोल-३, दि.२९.०३.२०२२
११) मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि. यांची दि.०८.१०.२०२०, दि.१४.१०.२०२०, दि.०१.०३.२०२१, दि.१५.०४.२०२१, दि.२३.०४.२०२१, दि.२१.०६.२०२१, दि.२५.०६.२०२१, दि.२९.०६.२०२१, दि.०२.०८.२०२१, दि.०७.०८.२०२१, दि.०१.१०.२०२१, दि.०४.१०.२०२१, दि.०६.१०.२०२१, दि.०७.१०.२०२१ व दि.०९.१०.२०२१ रोजीची देयके.
१२) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/ ६१६२/ MERS-डायल-११२/८१/२०१७-२१, दि.११.०२.२०२२.

**प्रस्तावना-**

राज्यातील नागरिकांना आपत्कालीन परिस्थितीत पोलीस सेवा उपलब्ध करून देण्यासाठी राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण करण्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ नुसार प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीत रु.४०४,४४,६१,५१९/- (चारशे चार कोटी चव्वेचाळीस लाख एकसष्ठ हजार पाचशे एकोणीस फक्त) एवढ्या प्रकल्प खर्चासह मे.महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांना Letter of Intent (LOI) निर्गमित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्याअनुषंगाने राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाकरिता अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई व मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. याच्यांत करार करण्यात आला आहे. डायल-११२ प्रकल्पाकरिता आजतागायत रु.१०९,७५,१७,७७२/- इतकी रक्कम संदर्भ क्र.६ ते ९ येथील शासन निर्णयान्वये अदा करण्यात आली आहे. (दि.०५.०३.२०२० रोजी रु.६,४३,४४,४८०/-, दि.२८.०८.२०२० रोजी रु.१,६०,८६,१६५/-, दि.१८.१२.२०२० रोजी रु.२१,०२,९९,८०९/-, दि.२३.०६.२०२१ रोजी रु.१०,३०,४५,२२६/-, दि.०५.१०.२०२१ रोजी

रु.८,५४,३६,०६०/-, दि.२४.११.२०२१ रोजी रु.४१,८३,०६,०३२/- व दि.२९.०३.२०२२ रोजी रु.२०,००,००,०००/- इतकी रक्कम अदा करण्यात आली आहे)

अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांनी संदर्भ क्र.१२ येथील पत्रानुसार डायल-११२ प्रकल्पातील DCR, PCC & SCC येथील साधनसामग्री खरेदी करण्याकरिता व कार्यान्वित करण्याकरिता [RFP clause ११.३, ११.४, ११.५ & ११.१३ (Volume-II)] आलेल्या एकूण रु.३९,३६,१७,४१९/- इतक्या रकमेची देयके पुरवठादार म्हणुन नियुक्त करण्यात आलेल्या मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम लि., मुंबई यांना खालीलप्रमाणे अदा करण्याची विंनती केली आहे:-

| Sr.No. | Milestone | RFP Clause | Amount (Rs.) |
|---|---|---|---|
| 1 | Hardware & software installation for PCC | 11.3 | 6,24,33,153/- |
| 2 | Hardware & software installation for SCC | 11.4 | 3,22,71,463/- |
| 3 | Hardware & software installation DCR of Phase-I | 11.5 | 4,90,94,325/- |
| 4 | Hardware & software installation DCR of Phase-II | 11.13 | 24,98,18,478/- |
| **Total** | | | **39,36,17,419/-** |

सदरची देयके प्रकल्प सल्लागार अर्नेस्ट ॲण्ड यंग यांनी अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांना दि.०६.०१.२०२२ रोजीच्या अग्रेषित केलेल्या पत्रान्वये प्रमाणित केली आहेत.

डायल-११२ प्रकल्पातील DCR, PCC & SCC येथील साधनसामग्री खरेदी करण्याकरिता व कार्यान्वित करण्याकरिता [RFP clause ११.३, ११.४, ११.५ & ११.१३ (Volume-II)] एकूण रु.३९,३६,१७,४१९/- इतकी रक्कम देय होत आहे. तथापि वितरीत निधी विचारात घेऊन मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम लि., मुंबई या कंपनीला देय असलेल्या एकूण रु.३९,३६,१७,४१९/- (रुपये एकोणचाळीस कोटी छत्तीस लाख सतरा हजार चारशे एकोणीस फक्त) इतक्या निधीपैकी रु.२०,००,००,०००/- (रुपये वीस कोटी फक्त) इतका निधी संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आला आहे.
उर्वरित देय निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्याबाबत वित्त विभागाने खालीलप्रमाणे मान्यता दिली आहे :-

| उदिष्ट | सुधारित अंदाज | वितरीत निधी | खर्च | वितरितपैकी शिल्लक निधी | सुधारित अंदाजापैकी शिल्लक निधी | आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| ५२ | ११२,५०,००,००० | ९२,००,२५,९१० | ९१,९०,२५,६३४ | १०,००,२७६ | २०,५९,७४,३६६ | (+) १९,३६,१७,४१९ |
| ५३ | ३५,४९,५०,००० | ०.०० | ०.०० | ०.०० | ३५,४९,५०,००० | (-) १९,३६,१७,४१९ |

यास्तव “५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री” या उदिष्टाखाली रु.१९,३६,१७,४१९/- इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सबब उर्वरित रु.१९,३६,१७,४१९/- (रुपये एकोणीस कोटी छत्तीस लाख सतरा हजार चारशे एकोणीस फक्त) इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय-**

पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पातील DCR, PCC & SCC येथील साधनसामग्री खरेदी करण्याकरिता व कार्यान्वित करण्याकरिता [RFP clause ११.३, ११.४, ११.५ & ११.१३ (Volume-II)] देय असलेल्या एकूण रु.३९,३६,१७,४१९/- (रुपये एकोणचाळीस कोटी छत्तीस लाख सतरा हजार चारशे एकोणीस फक्त) इतक्या निधीपैकी रु.२०,००,००,०००/- (रुपये वीस कोटी फक्त) इतकी

रक्कम वितरीत करण्यात आली आहे. आता देय उर्वरित रु.१९,३६,१७,४१९/- (रुपये एकोणीस कोटी छत्तीस लाख सतरा हजार चारशे एकोणीस फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके अदा करताना प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी. तसेच सदर रक्कमेच्या देयकात १८% जीएसटी (९%-CGST व ९%-SGST) कराचा समावेश आहे.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च "मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री," या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु निधी आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात यावे. तसेच त्यांनी उपरोक्त निधी आहरित करुन MAHINDRA DEFENCE SYSTEMS LTD या कंपनीच्या २०९-२१४, Kailash Building २६, Kasturba Gandhi Marg, New Delhi-११०००१ येथील HDFC बँकेच्या शाखेचे खाते क्र.०००३०३१००१४८०० (IFSC Code - HDFC०००००३) या खात्यावर जमा करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५९/२०२२/व्यय-७, दि.३०.०३.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११७०१०६८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: CN = RUPALI SANJOG KABARE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2022.03.31 17:06:05 +05'30'

**( रुपाली कबरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
६. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अपर पोलीस महासंचालक, नि. व स., महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि., अंधेरी पुर्व.
१६. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१७. अर्थसं-१/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. रोख शाखा/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती, पोल-३.